**सिंधुदूर्ग जिल्ह्यामध्ये खाणकाम प्रकल्प राबविण्यापूर्वी पर्यटन विभागाकडून ना-हरकत प्रमाणपत्र मिळविण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
उद्योग ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्र.एमएनजी-१००९/ प्र.क्र.२८४५/उ-९
मंत्रालय,मुंबई-४००० ३२.
दि.८ जून २००९

**वाचा** - १) शासन (पर्यटन विभाग) निर्णय क्र.एमटीसी ०९७/ प्र.क्र.८५२/ पर्यटन दि.२६ ऑगस्ट १९९७.
२) शासन(पर्यावरण विभाग)निर्णय क्र.सि.उ.खा.२००८/उ. ऊ व का./ प्र. क्र .१५७/तां.क.१, दि.०२.०१.२००९.

**प्रस्तावना:**

सिंधुदूर्ग जिल्हा हा शासन निर्णय दि. २६ ऑगस्ट ११९७ व्दारे पर्यटन जिल्हा म्हणून शासनाने घोषित केला आहे. सदर निर्णयानुसार सिंधुदुर्ग जिल्ह्यातील पर्यावरणाचे योग्य संतुलन व संरक्षण यावर अधिक भर देण्यासाठी पर्यावरण विभागाने योग्य ते नियोजन करावयाचे आहे. त्यानुसार पर्यावरण विभागाकडून खाणकाम प्रकल्पासंदर्भात शासन निर्णय दि.०२.०१.२००९ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. याशिवाय खाणकाम प्रकल्प राबविण्यापूर्वी पर्यटन विभागाकडूनही ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

खाणकाम प्रकल्प सुरु करण्यापूर्वी खाण व खनिजे (विकसन व विनियमन) अधिनियम, १९५७ नुसार तसेच वन संवर्धन अधिनियम १९८०, पर्यावरण संरक्षण अधिनियम १९८६, इत्यादी अंतर्गत आवश्यक ती पूर्वपरवानगी प्राप्त करुन घेणे खाणपट्टा धारकास बंधनकारक आहे.

२. तसेच खनिज सवलती मंजूरीसाठी उपलब्ध असलेली क्षेत्रे शासन राजपत्रात अधिसूचित करुन त्यासाठी अर्ज मागविण्यात येतात. यापुढे सिंधुदुर्ग जिल्ह्यातील अशी क्षेत्रे अधिसूचित करण्यापूर्वी संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांनी आवश्यक त्या तपशीलासह प्रस्ताव पर्यटन विभागास सादर करावा व पर्यटन विभागाचे "ना-हरकत " प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतरच क्षेत्रे खनिज सवलतीसाठी अधिसूचित करावीत.

३. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील जी क्षेत्रे यापूर्वीच खनिज सवलतीसाठी अधिसूचित करण्यात आली आहेत, परंतु त्यावर खनिज सवलती मंजूर करण्यात आलेल्या नाहीत अशी क्षेत्रे विना-अधिसूचित करुन



रोटा/एच-५३५(६००-६-२००९)-१

त्याबाबत उक्त परिच्छेद क्र. २ मधील तरतूदीप्रमाणे कार्यवाही करुन सदर क्षेत्रे पुन्हा अधिसूचित करण्याची कार्यवाही करावी.

४. खनिज सवलतीमध्ये पूर्वपहाणी परवाना, पूर्वेक्षण अनुज्ञप्ती व खाणपट्टा यांचा समावेश होतो.

५. सदर आदेश ज्या अर्जाकरीता हेतूपत्रे निर्गमित करण्यात आली आहेत किंवा ज्यांना खनिज सवलती यापूर्वीच देण्यात आलेल्या आहेत अशा प्रकरणी लागू होणार नाहीत.

६. ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्यासाठी लागणारा तपशील , अर्जाचा नमुना व प्रमाणपत्र देण्यास सक्षम प्राधिकारी इ. तपशील पर्यटन विभागाव्दारे विहीत करण्यात येईल व असा अर्ज पर्यटन विभागांत प्राप्त झाल्यापासून ४५ दिवसांचे (सार्वजनिक सुट्या वगळून) आत पर्यटन विभागाव्दारे त्याबाबत निर्णय घेण्यात येईल.

७. हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील आणि सिंधुदुर्ग जिल्ह्यापुरते लागू राहतील.

८. हा शासन निर्णय पर्यटन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(किशोर कदम)
उप सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (उद्योग)यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव
प्र.स. (उद्योग), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग
सचिव (पर्यटन),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग
सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई
संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
उपसंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, कोल्हापूर
जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग
उपविभागीय अधिकारी सावंतवाडी / कणकवली
पर्यटन अधिकारी, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, सिंधुदूर्ग
जिल्हा खनिकर्म अधिकारी, सिंधुदूर्ग
निवड नस्ती (उद्योग-९)

एच-५३५-९अ